राज्यातील सहकारी सूतगिरण्यांना राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या योजनेंतर्गत पुनर्वसन व विस्तारीकरण यासाठी शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) मंजुर करण्याबाबत. -
श्री व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या., इचलकरंजी, जि. कोल्हापूर.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः सूतगि ११०९/प्र.क्र.१२८/टेक्स-१ (अ)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख : ३१ मार्च, २०१७

वाचा -

१. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सूतगि ११९७/प्र.क्र.१९३/टेक्स १, दिनांक २४ मार्च, १९९९.
२. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सूतगि ११२०००/प्र.क्र.१२१/टेक्स १, दिनांक १७ नोव्हेंबर, २०००.
३. शासन पत्र समक्रमांक दिनांक २६ मे, २०१४.
४. रा. स. वि. नि. पत्र क्रमांक NCDC -२०-३/२०१४-Tex/१०९/SA ४००६१, दिनांक २२ ऑगस्ट,२०१४,
५. शासन निर्णय क्रमांक : सूतगि ११०९/प्र.क्र.१२८/टेक्स-१ (अ), दिनांक ९ नोव्हेंबर, २०१५
६. संचालक वस्त्रोद्योग यांचे पत्र क्र. कार्या ६ (१)/सूतगि/२७५४/२०१७, दिनांक १८ मार्च, २०१७

प्रस्तावना :-

राज्याची मर्यादित साधनसामुग्री लक्षात घेता, सहकारी सूतगिरण्यांना त्यांच्या आधुनिकीकरण / विस्तारीकरण व पुनर्वसन करण्यासाठी तसेच प्रकल्प उभारणीसाठी अर्थसहाय्य करण्याच्या योजना राज्यात दि.१७/११/२००० च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आली आहे. या योजनेस अनुसरुन राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने सूतगिरण्यांचे पुनर्वसन / विस्तारीकरण व प्रकल्प उभारणीसाठी संदर्भाधीन अनुक्रमांक ४ येथील पत्रान्वये श्री व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या., इचलकरंजी, जिल्हा कोल्हापूर च्या रु.३३८०.०० लाख प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मान्यता दिली असून आकृतीबंधानुसार मुदत कर्ज रु.१५०२.२८ लाख, शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) रु.९५०.०० लाख, शासकीय अनुदान रु.५०७.०० लाख व सभासद भागभांडवल रु.४२०.७२ लाख असे एकूण रु.३३८०.०० लाखाचा प्रस्ताव राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूर केला आहे. त्यानुसार या सूतगिरणीस शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) रु.३९६.८१ लाख सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या., इचलकरंजी, जि. कोल्हापूर या गिरणीच्या रु.३३८०.०० लाख प्रकल्प किंमतीच्या प्रस्तावास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मान्यता दिली असून आकृतीबंधानुसार मुदत कर्ज रु.१५०२.२८ लाख, शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) रु.९५०.०० लाख, शासकीय अनुदान रु.५०७.०० लाख व सभासद भागभांडवल रु.४२०.७२ लाख असे एकूण रु.३३८०.०० लाखाचा प्रस्ताव राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूर केला आहे. रा.स.वि.नि. ने सदर सूतगिरणीस पुनर्वसन / विस्तारीकरण या योजनेंतर्गत मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) च्या रक्कमेपैकी रु.३,९६,८१,०००/- (रुपये तीन कोटी श्यान्नव लाख एक्याअंशी हजार फक्त) इतकी रक्कम सदर सहकारी सूत गिरणीस शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) म्हणून वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सूतगि ११९७/प्र.क्र.१९३/ टेक्स १, दिनांक २४/३/१९९९, तसेच संदर्भ क्रमांक ४ येथील राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या पत्रांमध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती सदर गिरणीस बंधनकारक राहतील. तसेच, मुदती कर्जासाठी व शासकीय भागभांडवलासाठी शासनाने / राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास, त्या गिरणीस बंधनकारक राहतील, अशा अतिरिक्त अटी व शर्ती च्या अधीन राहून, सदर रक्कम मंजूर करण्यात येत आहे. शासनातर्फे देण्यात येणाऱ्या सदर मुदती कर्जाचा परतावा संबंधीत गिरणीकडून शासनास विहित वेळेत व विहित मुदतीत प्रदान होईल, यासंदर्भात संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी काटेकोर अंमलबजावणी करावी.

३. वरील मंजूर करण्यात आलेली शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) वितरीत करण्यापूर्वी गिरणीने सदर रक्कमेवरील २% सेवाशुल्काच्या रक्कमेचा भरणा करावा. जोपर्यंत सदर रक्कमेवरील २% सेवाशुल्काच्या रक्कमेचा भरणा सदर सुतगिरणी करणार नाही तोपर्यंत या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात येत असलेली रक्कम संचालक वस्त्रोद्योग यांचे मान्यतेशिवाय सदर सूत गिरणीस खर्च करता येणार नाही व त्या प्रकारे संचालक वस्त्रोद्योग यांनी बँकेवर बंधन आणावे.

४. वरील मंजूर करण्यात आलेले शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) गिरणीने आठ वर्षाच्या कालावधीमध्ये व्याजासह परत करावयाचे आहे. सूतगिरणीवर रा.स.वि.नि. च्या दि.२२.८.२०१४ रोजीच्या पत्रातील अटी व शर्ती बंधनकारक राहतील. तसेच सदर शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) गिरणीस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) परतफेड दिलेल्या शेडयुलप्रमाणे करण्याची जबाबदारी गिरणीची / गिरणीच्या संचालक मंडळाची राहील. याबाबत संचालक मंडळाकडून संचालक, वस्त्रोद्योग यांनी तसे बंधपत्र घेण्यात यावे.

२) शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) परतफेड दिलेल्या शेडयुलप्रमाणे गिरणीने / विद्यमान संचालक मंडळाने केली नाही तर सदर कर्ज घेतेवेळी कार्यरत असणाऱ्या विद्यमान संचालक मंडळाच्या वैयक्तिक मालमत्तेतून कर्जाचा हप्ता भरण्यात यावा.

३) ज्या कारणासाठी सदर सूतगिरणीस शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) मंजूर करण्यात येणार आहे. त्या कारणासाठीच सदर कर्जाचा विनियोग करण्याची जबाबदारी गिरणीच्या विद्यमान संचालक मंडळाची राहील. जर गिरणीने कर्जाचा विनियोग इतर कारणासाठी केल्यास सदर कर्जाची वसूली सदर कर्ज घेतेवेळी कार्यरत असणाऱ्या विद्यमान संचालक मंडळाच्या वैयक्तिक मालमत्तेतून करण्यात यावी.

४) केंद्र शासनाकडून सदर सूतगिरणीस सबसिडी मंजूर झाल्यानंतर सदर रक्कमेतून शासकीय देणी देण्याची रक्कम वळती करुन घ्यावी. तसेच शिल्लक राहणाऱ्या शासकीय देण्यांची रक्कम गिरणी पूर्ण उत्पादनाखाली आल्यानंतर वसूल करण्यात यावी.

५) रा.स.वि.नि. योजनेंतर्गत शासकीय भाग भांडवल / गुंतवणूक कर्जाची परतफेड विहित वेळेत गिरणीमार्फत होईल यासाठी आवश्यक असलेली सर्व दक्षता संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

६) या सूतगिरणीस मिळालेले अर्थसहाय्य संबंधित प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे संस्थेवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एक रकमी वसूल करण्यात येईल. तसेच, अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

५. सदर शासकीय भाग भांडवल शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व सूतगि-११९७/ प्र.क्र.१९३/ टेक्स-१, दि. २४.३.१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच शासकीय भाग भांडवलासंदर्भात शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्ती सदर सूतगिरणीस लागू राहतील या मुद्दयाच्या अधीन राहून तसेच खाली नमूद केलेल्या अतिरिक्त अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे :-

१) प्रस्तुत सूतगिरणीकडून, शासन निर्णय, स.,प. व व. विभाग, क्र. सूतगि-२१९३/ प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३ व दिनांक २४.३.१९९९ मधील अटी व शर्तीचे पालन होत आहे याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

२) प्रस्तुत सूतगिरणीने मंजूर होणाऱ्या रक्कमेच्या २०% इतक्या वैयक्तिक मालमत्तेचे तारण दिले आहे. परंतु सूतगिरणींच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास, नवनियुक्त संचालक मंडळास ३ महिन्यांच्या आत वैयक्तिक मालमत्तेचे तारण द्यावे लागेल. नवनियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतरच पूर्वीच्या संचालक मंडळाचे वैयक्तिक तारण मुक्त करण्यात येईल अशी सुधारणा संस्थेच्या Bye-Laws मध्ये करण्याची कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

३) सदर सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल संचालक वस्त्रोद्योग यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.

४) प्रस्तुत गिरणी संदर्भात शासन निर्णयामधील तरतुदीनुसार वसुलीबाबत काटेकोरपणे कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी .

५) सूतगिरणीच्या प्रकल्पास मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाच्या Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही. त्यामुळे त्याबाबतची खात्री संचालक वस्त्रोद्योग यांनी करुन घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

६) प्रस्तुत सूतगिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करीत असल्याची खात्री संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

७) प्रस्तुत सूतगिरणीने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

८) प्रकल्प अहवालातील अनुज्ञेय तरतुदीपेक्षा त्या त्या बाबीवर होणारा जास्तीचा खर्च गिरणी स्वनिधीतून करील या अटीवर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी तशी कार्यवाही करावी.

९) सदर सहकारी सूतगिरण्यांच्या खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे अदा करावी. निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रीम अदा करण्यात येऊ नये याबबात संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

१०) गिरणीस प्राप्त झालेल्या भागभांडवलाचा तसेच गिरणीकडे शिल्लक असलेल्या रकमेचा गिरणी योग्य प्रकारे विनियोग करते किंवा नाही याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

११) सूतगिरणीने भांडवली वस्तु खरेदी करण्यापूर्वी यापूर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची यथास्थित नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात यावी. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१२) प्रस्तुत गिरणीने खरेदी केलेल्या वस्तू प्रत्यक्ष प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयक अदा करावे. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण करावे.

१३) खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी.

१४) सूतगिरणीची उभारणी विहित कालमर्यादेत पूर्ण करावी.

१५) सहकारी सूतगिण्यांवर शासकीय अधिकारी नेमण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन असून याबाबतचा अंतिम निर्णय सर्व सूतगिरण्यांना बंधनकारक राहील.

१६) शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि-११९७/ प्र.क्र.१९३/ टेक्स-१, दि. २४.३.१९९९ मध्ये शासकीय भाग भांडवल परतफेड करण्याच्या अनुषंगाने विहीत केलेल्या अटींमध्ये सुधारणा प्रस्तावित असून त्याबाबतचा अंतिम निर्णय सदर सूतगिरणीवर बंधनकारक राहतील.

६. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.२०१६ अन्वये, "३२-अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी ११, १२, १३, १६, १७ व १८ मधील तरतूदी या प्रकरणी लागू नाहीत. परिच्छेद ७अ, ७ब, ७क, ८, ९, १०, १४ व १५ मधील तरतूदी या प्रकरणी लागू असून सदर तरतुदींची सदर प्रकरणी खालीलप्रमाणे पूर्तता होत आहे.

**७अ)** एखाद्या योजनेस / प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणे :- श्री. व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या., इचलकरंजी , जि.कोल्हापूर या सूतगिरणीस वित्त व नियोजन विभागाच्या सहमतीने रा.स.वि.नि., नवी

दिल्ली यांचेकडील दि.२२.८.२०१४ च्या पत्रानुसार ३३८०.०० लाख विस्तारीकरण व पुनर्वसनाकरिता प्रकल्प अहवाल किंमतीस मंजूरी देण्यात आली आहे.

**७ब)** नियतव्यय उपलब्धता :- सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद ९.२) मध्ये नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली नियतव्यय अर्थसंकल्पित आहे.

**७क) व ८)** विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६/ प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ अन्वये "३२ अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास वित्तीय अधिकार प्राप्त आहेत.

**९)** पूर्वी खर्च केलेल्या अनुदानाबाबत उपयोगिता प्रमाणपत्रे :- विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था (सूतगिरण्या), सांगली यांनी दि.१६.३.२०१७ नुसार उपयोगीता प्रमाणपत्र संचालक, वसत्रोद्योग, नागपूर यांना सादर केले आहे.

**१०)** संक्षिप्त देयक प्रलंबितता :- सदर लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक तपशीलवार देयक सादर करण्यासाठी प्रलंबित नाही.

**१४)** बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय / तांत्रिक मान्यता :- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

**१५)** कार्यालयीन खरेदीसाठीची कार्यपद्धती :- खरेदी विषयक प्रक्रिया अद्यावत शासन निर्णय क्र. भांखस २०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार करण्यात यावी .

तसेच वित्त विभागाच्या दिनांक दिनांक २०.४.२०१६ च्या शासन निर्णयातील तपासणी सूचीतील अ.क्र. ९ मध्ये नमूद केलेल्या अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

७. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- ब मधील २) नुसार, वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ च्या परिशिष्टातील अनु. क्र. १, २, ४, ५, ६, ७ व ८ या प्रकरणी लागू नसल्याने व परिशिष्टातील अ.क्र. ३ बाबत नमूद करण्यात येते की, सदर योजना ही नियमित स्वरुपाची राज्य योजनांतर्गत योजना असल्याने तसेच योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने व "३२- अंशदाने" या बाबीखाली शासकीय भाग भांडवलाचे वितरण सदर प्रकरणी करीत असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

८. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण - २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- ब मधील ३) नुसार, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. ३ मधील तरतुदी विचारात घेता योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

९. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- ब मधील ३ नुसार, वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ संदर्भातील तपासणी सुचीमधील या प्रकरणी लागू असलेल्या मुद्दयांची पूर्तता होत आहे.

वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे:-

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :- वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६/ प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ अन्वये "३२ अंशदाने" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

२) मंजूर निधी :- "मागणी क्र.व्ही-३, लेखाशीर्ष ४४२५ सहकारावरील भांडवली खर्च- (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०६) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (रा.स.वि.नि.) (४४२५ ०३४७), ३२ अंशदाने या खाली रु.४००.०० लाख इतका नियतव्यय प्राप्त झाला असून रु.४००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीपैकी सन २०१६-१७ मध्ये अद्याप कोणताही खर्च झालेला नाही.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- सदर सुतगिरणीस यापूर्वी पर्यंत प्राप्त मुदती कर्ज रु.८७३.३९ लाख व शासकीय भागभांडवल रु.५५३.१९ लाख असे एकूण१४२६.५८ लाख रक्कमेपैकी प्रकल्पाच्या उभारणीवर एकूण रु.१०६९.९० लाख खर्च केले असल्याबाबत संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दि.१८.३.२०१७ च्या पत्रान्वये कळविले आहे.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- या योजनेखाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :- सूतगिरणीच्या स्थापत्य बांधकामाच्या निविदांना मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीची मान्यता घेऊनच सूत गिरणीने बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी करणे बंधनकारक आहे.

८) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत :- सहकारी सूतगिरण्यांच्या यंत्रसामुग्री खरेदीबाबत राज्यस्तरीय समितीची मान्यता घेण्यात येते.

९) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा:- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी :- याबाबतचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

१०. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेली रा.स.वि.नि.योजनेंतर्गत शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) रक्कम रु.३,९६,८१,०००/- (रुपये तीन कोटी श्यान्नव लाख एक्याअंशी हजार फक्त) सदर सूतगिरणी संदर्भात संचालक, वस्त्रोद्योग यांचे कडून प्राप्त झालेले बँक खाते, आयडीबीआय बँक, शाखा इचलकरंजी, खाते क्रमांक ४६७१२०१०००५५८० मध्ये RTGS **द्वारे** जमा करावी. गिरण्यांनी प्रकल्प पूर्ण करण्यासाठी, कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात शासन निर्णय क्रमांक सूतगि १२००/११७१३/प्र.क्र.४२६/टेक्स-१ (अ), दिनांक १५.६.२००६ अन्वये

स्थापन केलेल्या संबंधीत सनियंत्रण समित्यांची मान्यता घ्यावी. गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

११. पुनर्वसन / विस्तारीकरण केल्यानंतर गिरणी वर्धनक्षमतेने चालेल व राज्य शासनाच्या अर्थसहाय्याची परतफेड विहित वेळेत गिरणीमार्फत होईल यासाठी आवश्यक असलेली सर्व दक्षता संचालक वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

१२. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या पुनर्वसन / विस्तारीकरण योजनेंतर्गत या सूतगिरण्यांना मिळालेले अर्थसहाय्य संबंधित प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे संस्थेवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एक रकमी वसूल करण्यात येईल. तसेच, अशा प्रकरणी संबंधीत संचालक मंडळास व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

१३. श्री व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या. इचलकरंजी, जिल्हा कोल्हापूर (SHRI VYANKTESH SHETKARI VINKARI SAHAKARI SOOT GIRNI LTD., ICHALKARANJI, DIST. KOLHAPUR) या सूतगिरणीस या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) रक्कम रुरु.३,९६,८१,०००/- (रुपये तीन कोटी श्यान्नव लाख एक्याअंशी हजार फक्त) इतक्या रा.स.वि.नि. योजनेंतर्गत शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) चा खर्च "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च - (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना - (००) (०६) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (रा.सं.वि.म.) (४४२५ ०३४७), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

१४. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.३,९६,८१,०००/- (रुपये तीन कोटी श्यान्नव लाख एक्याअंशी हजार फक्त) इतकी रा.स.वि.नि. योजनेंतर्गत शासकीय भागभांडवल (गुंतवणूक कर्ज) ची रक्कम संचालक, वस्त्रोद्योग यांचे कडून प्राप्त झालेले बँक खाते, आयडीबीआय बँक, शाखा इचलकरंजी, खाते क्रमांक ४६७१२०१०००५५८० मध्ये **RTGS द्वारे** श्री व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या. इचलकरंजी, जिल्हा कोल्हापुर या सूतगिरणीस RTGS द्वारे निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री.र. ग. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. ब. बा. चव्हाण, सह सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी श्री व्यंकटेश शेतकरी विणकरी सहकारी सूतगिरणी मर्या. इचलकरंजी, जिल्हा कोल्हापुर (SHRI VYANKTESH SHETKARI VINKARI SAHAKARI SOOT GIRNI LTD., ICHALKARANJI, DIST. KOLHAPUR) यांच्या आयडीबीआय बँक, शाखा इचलकरंजी, खाते क्रमांक ४६७१२०१०००५५८० मध्ये **RTGS द्वारे** सदर रक्कम वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

१५. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि. २०.४.२०१६ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३११४४७०११४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2017.04.01 16:55:35 +05'30'

(विशाल मदने)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
२. महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
४. कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (४ प्रतींसह)
५. कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
६. वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,
७. नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१०. राष्ट्रीय सहकारी विकास निगम लि, ४, सिरी इन्स्टीटूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली-११० ०१६
११. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर,
१२. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर,
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
१६. व्यवस्थापक, आय.डी.बी.आय. बँक, शाखा इचलजकरंजी, जि.कोल्हापूर
१७. महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,
१८. अध्यक्ष, श्री व्यंकटेश सहकारी सूतगिरणी मर्या. इचलकरंजी, जिल्हा कोल्हापुर
१९. निवडनस्ती (टेक्स १ अ / ब)